GR-200408051606360002-1201

जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्रामपंचायती व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेव्दारे पंजिकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना/लोक सेवा केंद्रांना द्यावयाच्या विविध सवलती.

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन शुध्दीपत्रक क्रमांक- झेडपीए २००२/प्र.क्र.२०८/३३.(वित्त-९),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक - १३ ऑक्टोबर, २००३
संदर्भ : ग्राम विकास व जलसंधारण विभाग.शासन निर्णय क्रमांक- झेडपीए-२००२/प्र.क्र.२०८/३३,(वित्त-९), दिनांक २० डिसेंबर, २००२.

**शासन शुध्दीपत्रक:**

संदर्भाधीन शासन निर्णयातील स्थावर मत्तेची देखभाल डागडुजी व दुरुस्ती करण्याबाबत, या उपशिर्षकाखालील ७) रद्द करण्यांत येत असुन तो खालीलप्रमाणे वाचण्यात यावा.

"७) या विभागाच्या धोरणानुसार ग्रामपंचायतींना व मजुर सहकारी संस्थांना रु. ५लाखापर्यंत मुळ विकास योजनांची व विकासाची कामे विना निविदा देता येतात. बेरोजगार अभियंत्यांच्या सेवा सहकारी संस्थांना या विभागाने विना निविदा कोणतेही विकास काम व विकास योजना देण्याबाबत आदेश निर्गमित केलेले नाहीत. यामुळे बेरोजगार अभियंत्यांच्या सेवा सहकारी संस्थांना विना निविदा कोणतीही मुळ विकास कामे किंवा मुळ विकास योजनांची कामें देता येणार नाहीत. आता बेरोजगार अभियंत्यांच्या सेवा सहकारी संस्था किंवा लोकसेवा केंद्रांना स्थावर मत्तेची देखभाल डागडुजी व दुरुस्ती करण्यासाठी रु. पांच लाखापर्यन्तची कामे विना निविदा देता येतील. ग्रामपंचायतींना व मजुर सहकारी संस्थादेखील अशी स्थावर मत्तेची देखभाल डागडुजी व दुरुस्ती करण्याबाबतची कामे रु. पांच लाखापर्यन्तची कामे विना निविदा देता येतील. मात्र यापैकी जी संस्था कमी किंमतीत सदरहू काम करतील व उत्कृष्ट दर्जाची हमी देतील अशा संस्थांना अशी कामे देण्यात यावीत."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( जयश्री चौधरी )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

240 NOTB-63-1-88-17-3